सहसंचालक, गट-अ, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय या पदावर पदोन्नती व पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. औसुवआ-०२२३/प्र.क्र.२९/कामगार-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ जून, २०२३.

**शासन आदेश**

सहसंचालक, गट-अ या औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पदावर सन २०२२-२३ या निवडसूची वर्षात पदोन्नतीकरिता सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उपसंचालक, गट-अ (वेतनश्रेणी एस-२०:५६१००-१७७५००) या संवर्गातील खालील नमूद अधिकाऱ्यांस, सहसंचालक, गट-अ (वेतनश्रेणी एस-२३:६७७००-२०८७००) या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची खालीलप्रमाणे पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | जात प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.प्र.वि.सुरसे | इ.व.मा. | खुला | सहसंचालक, औ.व आ.सु., औरंगाबाद |
| २ | श्री.इ.श.खान | इ.व.मा. | खुला | सहसंचालक, औ.व आ.सु., सातारा |

२. सदर अधिकाऱ्यांना सहसंचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

(अ) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/कार्या.१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसा स्पष्ट उल्लेख पदोन्नतीच्या आदेशात करावा.

(आ) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(इ) निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०१.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केली आहे.

३. सदर शासन आदेशाच्या अनुषंगाने, संचालक (अ.का.), औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी, उपरोक्त अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ

कार्यमुक्त करावे. तसेच, कार्यमुक्त केल्यानंतर सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १९.११.२०१६ अन्वये घोषित करण्यात आलेले नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२२१८४२१६७७१० असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.06.22 18:43:11 +05'30'

**( दिपक पोकळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
२. सर्व पदोन्नत अधिकारी (द्वारा:- संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुदेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा/औरंगाबाद
७. सर्व अपर संचालक/सहसंचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय
८. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२, कार्यासन-१६-ब, मंत्रालय, मुंबई ३२
९. उपसचिव (काम.१)/अवर सचिव (काम-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती.